**फजलानी आयशाबाई ॲन्ड हाजी अब्दुल लतीफ चॅरिटेबल ट्रस्ट मौ.टाकवे बु. ता. मावळ, जि. पुणे या संस्थेस आंध्रा प्रकल्पाचे जलाशयातुन बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitlement) प्रस्तावास मंजुरी मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक.बिसिंआ २०१९/(३९२/१९)/सिं.व्य.(धो-२)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०७/११/२०१९

**संदर्भ** : -१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र दि.२३/०८/२०१९
२) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४
३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि. १७/११/२०१६
४) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६

**प्रस्तावना:-**

१.० संदर्भिय पत्र क्र. १ अन्वये कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचेकडून फजलानी आयशाबाई ॲन्ड हाजी अब्दुल लतीफ चॅरिटेबल ट्रस्ट मौ.टाकवे बु. ता. मावळ, जि. पुणे या संस्थेस फजलानी इंटरनॅशनल स्कुल,अनाथालय व स्टाफ व वसतिगृहासाठी आंध्राप्रकल्पाच्या जलाशयातून बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्कास (Bulk Water Entitlement) मंजुरी मिळणेबाबत प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.३ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या व औद्योगिक पाणी वापराच्या बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा.मंत्रीमंडळ उप समितीला देण्यात आले आहेत. याअनुषंगाने शासनास प्राप्त झालेल्या खालील प्रस्तावांना मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते .

**शासन निर्णय :-**

२.० मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या सदस्यांमध्ये चक्राकार पध्दतीने नस्तीवर घेतलेल्या निर्णयानुसार खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमूद संस्थेला त्यांचे नावासमोर रकाना क्र.४ मध्ये नमूद मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्कास,परिच्छेद ३.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अनु. क्र. | संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/कालवा/ नदीचेनांव | मंजूर केलेले मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitlement) (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | फजलानी आयशाबाई ॲन्ड हाजी अब्दुल लतीफ चॅरिटेबल ट्रस्ट मौ.टाकवे बु. ता. मावळ, जि. पुणे | औद्योगिक | आंध्रा जलाशयातून | ०.०२०० दलघमी |

३.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्याअधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१३/(४१५/२०१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४ व शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/ (प्र.क्र.२७४/नवि-३३),दि. १७/१२/२०१६ मधील तरतुदीं नुसार सिंचन पुर्नस्थापनेच्या खर्चाबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

२. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १००१/(७१३/२००१)/सिंव्य(धो), मुंबई- ३२, दि. ७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणी पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.

६. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

७. पाणी उचलण्याची/ पुरवठ्याची जागा व क्षेत्रीय परिस्थितीनुसार इतर अटी शर्तीचा अंर्तभाव करून संबधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

८. "This reservation is only the letter of support for the, water supply scheme or the industry as the case may be. Actual quantity of water that will be supplied every year shall be governed by the entitlement granted to the water user entity by the River Basin Agency based on the population and the reasonable use norm decided by this Authority and the yearly allocation declared by the prescribed Authority on the basis of reservoir contents of the year and shall be subjected to various provisions in the agreement that will be signed by the water user entity with River basin Agency."

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१९११०७१७१६३९६०२७ असाआहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Rajratna Kurane

Digitally signed by Vaishali Rajratna Kurane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bcb246dbefe0ab1afab472a3a4244bbacc301c65adbfb6f57e6a45fab5aa7b8, cn=Vaishali Rajratna Kurane
Date: 2019.11.07 17:21:51 +05'30'

**(वै.रा.कुरणे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१० प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे
१३. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग,पुणे
१५. अधीक्षक अभियंता , जलसंपदा विभाग,पुणे
१६. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)